नागपूर महानगरपालिका.
नागपूर महानगरपालिका ठराव
क्रमांक-१४५ दिनांक १३.८.२००३ हा
विखंडीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय, क्रमांक-नामपा.२३०४/७०६/प्र.क्र.८५/०४/नवि.२६,
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- २१ मे, २००५.

वाचा :- (१) आपले क्र.७७/वि.का.अ. (चौकशी) ०४, दि.१५.४.२००४ चे पत्र.
(२) आपले क्र.१७३/वि.का.अ. (चौकशी) ०४, दि.१२.८.२००४ चे पत्र.

प्रस्तावना :-

नागपूर महानगरपालिकेतील आर्थिक आणि प्रशासकीय अनियमितते संबंधातील कारभाराची चौकशी करण्यासाठी नियुक्त, श्री.नंदलाल समितीने केलेल्या शिफारशीनुसार महानगरपालिकेतील तत्कालीन अति.उपायुक्त श्री.साहेबराव य.राऊत यांचे विरुध्द विभागीय चौकशी सुरु करण्यात आली होती. श्री.राऊत, हे शिक्षणाधिकारी म्हणून कारभार सांभाळत असताना आर्थिक व प्रशासकीय अनियमिततेमध्ये सहभाग असल्याचे चौकशी समितीला दिसून आल्यामुळे श्री.राऊत यांना दिनांक २६.९.२००० रोजी सेवेतून निलंबित करण्यात आले.

विभागीय चौकशी अधिका-याच्या अहवालानुसार श्री.राऊत यांच्यावरील दोषारोप अंशत: सिध्द होत असल्याने चौकशी अहवालाची प्रत अपचारी अधिकारी यांना पाठवून त्या संबंधात अभिवेदन / निवेदन करण्याची संधी देण्यात आली होती. अंतिमत: या प्रकरणी श्री.राऊत यांचे विरुध्द पूर्णपणे वा अंशत: सिध्द झालेल्या दोषारोपासाठी महानगरपालिका सेवेतून बडतर्फ

करण्याचा शिफारस वजा प्रस्ताव मा.महापौर मार्फत सभागृहाला दिनांक-२३.९.२००२ रोजी सादर केला.

दरम्यान काळात सभागृहाचे क्रमांक-८५, दिनांक-२६.१२.२००३ च्या ठरावानुसार सुनावणी समितीने सादर केलेल्या अहवालाची छाननी/शहानिशा करुन प्रस्ताव सभागृहाकडे निर्णयासाठी सादर करणेस आयुक्तांना निर्देश दिले आहेत. सुनावणी अहवालावर या आधी तत्कालीन आयुक्तांनी प्रस्तावित केलेल्या बडतर्फीचे शिक्षेसंबधात काहीही बदलाची आवश्यकता भासत नसल्याचे आयुक्तानी अभिप्राय दिले आहेत.

आयुक्त, महानगरपालिका यांनी सादर केलेला प्रस्ताव नामंजूर करुन सुनावणी समितीने केलेल्या शिफारशीस सभागृहाने मान्यता प्रदान करुन श्री.राऊत यांना त्याच्या पूर्वपदावर पुनःस्थापित करण्याबाबत ठराव क्रमांक-१४५, दिनांक-१३.८.२००३ रोजी पारित करण्यात आला. त्यानुसार श्री.राऊत यांचे निलंबन मागे घेण्यात येऊन त्यांना दिनांक-३.९.२००३ च्या आदेशान्वये पुनः स्थापना करण्यात आली.

नागपूर महानगरपालिकेचा ठराव क्रमांक-१४५, दिनांक-१३.८.२००३ प्रस्तापित अधिनियमातील व इतर अस्तित्वात असलेल्या कायदयाचा तरतूदीशी विसंगत असल्यामुळे त्याला पूर्णपणे मंजूरी देणे कायदयाला धरुन होणार नव्हते. तरीही फक्त श्री.राऊत यांचे निलंबन मागे घेण्याचे बाबीला मंजूरी देण्यात आली. महानगरपालिकेचा ठराव नियम व अधिनियमातील तरतूदीशी विसंगत असल्याने महानगरपालिकेचा ठराव क्रमांक-१४५, दिनांक-१३.८.२००३ चा पारीत केलेला ठराव अधिनियमाच्या कलम ४०७ अन्वये विखंडीत करण्यात येऊन श्री.राऊत यांना कलम ४०५ अन्वये बडतर्फ करण्याची आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी

दिनांक-१५.४.२००४ व दिनांक-१२.८.२००४ च्या पत्रान्वये शासनास विनंती केलेली आहे.

<u>शासन निर्णय :-</u>

नागपूर महानगरपालिकेचा ठराव नियम व अधिनियमातील तरतूदीशी विसंगत असल्याने नागपूर महानगरपालिकेचा ठराव क्रमांक-१४५, दिनांक-१३.८.२००३ हा ठराव नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम १९४५ च्या कलम-४०७ अन्वये शासनास प्राप्त झालेल्या अधिकाराचा वापर करुन या आदेशान्वये विखडीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

वि.बा.सुपेकर

( वि. बा. सुपेकर )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

(१) आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.

(२) निवड नस्ती, नवि. २६.